





**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**

**दुरध्वनी क्र ०२२-२२७९३६१८** Email Id : GAD_१२A@maharashtra.gov.in

---

क्रमांक : प्रतिनि २०२५/प्र.क्र.१७/प्रशि-४ दिनांक : १७ मार्च, २०२५.

**प्रति,**
सह/उपसचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय,मुंबई.

**विषय :** वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेतील राज्य प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रतिनियुक्तीने भरावयाच्या पदांबाबत.

**संदर्भ :** १.सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६
२.सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०२१८
३. सा.प्र.वि.शा.नि.क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११
४. सा.प्र.वि.शा.नि.क्र.यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दि.११.०५.२०१५

महोदय/महोदया,

वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, धरमपेठ, नागपूर या संस्थेमध्ये राज्य प्रशिक्षण धोरण २०११ नुसार राज्य प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत शासन सेवेतील अधिकारी वर्ग-२ व वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येतात. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई क्र. यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दि.११ मे, २०१५ मध्ये नमुद केलेली पदे भरण्याची कार्यपध्दती व प्रतिनियुक्तीने भरण्यात येणाऱ्या पदांच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या विहित केल्या आहेत.

त्यास अनुसरुन शासन सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई या विभागाच्या अधिपत्याखालील **वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, धरमपेठ, नागपूर** या कार्यालयातील **राज्य प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत** खालील नमूद करण्यात आलेल्या पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचेकडून विहित नमुन्यात अर्ज मागविण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | गट | पदांची संख्या | पदाची वेतनश्रेणी ७th pay नुसार |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सहाय्यक प्राध्यापक वर्ग-१ | अ | ०८ | (एस १९ ५५१००-१७५१००) |
| २ | आवार व वसतीगृह व्यवस्थापक | क | ०१ | (एस-१३ ३५४००-११२३००) |
| ३ | ग्रंथपाल | क | ०१ | (एस-८ २५५००-८११००) |
| | एकूण पदे | | १० | |

२. प्रतिनियुक्तीने नियुक्ती प्रथमत: तीन वर्षाच्या कालावधीसाठी राहील, तदनंतर आवश्यकता विचारात घेऊन संबंधी अधिकारी यांची इच्छुकता व प्रतिनियुक्तीने सेवा देणा-या संवर्ग नियंत्रण प्राधिका-याच्या सम्मतीने हा कालावधी जास्तीत जास्त ५ वर्षापर्यंत वाढविता येईल.

३. सर्व प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या वर नमूद केलेल्या संवर्गातील सर्व अधिकारी यांच्या निदर्शनास आणण्यात यावे.

४. सदर पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी इच्छुक व पात्र अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचे अर्ज सोबत जोडलेल्या विहीत नमून्यात टंकलिखित करुन त्यांच्या प्रशासकीय विभागामार्फत संस्थेकडे **दिनांक ०६/०४/२०२५** पर्यंत पोहोचतील अशा बेताने पाठवावे.

५. प्रतिनियुक्तीने नियुक्ती घेऊ इच्छिणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांनी ते सद्या शासन सेवेत असल्याबाबतचे त्यांच्या कार्यालय प्रमुखाचे प्रमाणपत्र अर्जासोबत जोडावे.

६. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग(कार्या-१२), दि.१७.१२.२०१६ व समक्रमांक दि.१६.२.२०१८ व साप्रवि/(कार्या-१२अ), दि.११.५.२०१५ मधील निर्धारित तरतुदी, अटी व शर्तीनुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत अर्जांची तपासणी करण्यात येईल.

७. प्रशासकीय विभागानी / संवर्ग नियंत्रक विभागानी परिपूर्ण स्वरुपातील अर्ज त्यांचे आवश्यक प्रमाणपत्रांसह व संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांच्या मागील ५ वर्षाचे परिपूर्ण गोपनिय अहवालाच्या सत्यप्रतीसह संस्थेकडे **दि.०६/०४/२०२५** पर्यंत पोहोचतील अशारीतीने पाठवावेत. विहीत मूदतीत अर्ज प्राप्त न झाल्यास अशा अधिकारी/कर्मचारी यांचा विचार केला जाणार नाही.

८. अंतिम दिनांकास प्राप्त अर्जांची छाननी केल्यानंतर पात्र अर्जांबाबत प्रस्ताव सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात येतील.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१७१७४६१९७२०७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**आपली,**

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B9450F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2025.03.17 17:47:52 +05'30'

**( गीता कुलकर्णी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, धरमपेठ, नागपूर
२. निवडनस्ती/प्रशि-४ (१२-अ)

## परिशिष्ट- ड

### प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अर्जदारांनी करावयाच्या अर्जाचा नमुना

१. अ) संपूर्ण नाव) :- ____________________

२. ब) पदासाठी अर्ज केला आहे ते पद व कार्यालयाचे नाव :- ____________________

३. क) सध्या धारण केलेले पद व पदस्थापनेचे ठिकाण :- ____________________

द) वेतनश्रेणी :- ____________________

४. सध्या कार्यरत असलेल्या पदाचा संवर्ग नियंत्रक विभाग :- ____________________

५. जन्मदिनांक :- ____________________

६. अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास असलेले वय (वर्षे व महिने) :- ____________________

७. शैक्षणिक अर्हता :- ____________________

८. मागासवर्गीय प्रवर्गात येत असल्यास प्रवर्ग :- ____________________

९. सध्या धारण केलेले पद नियमित आहे किंवा तात्पुरते आहे, नियमित असल्यास नियमित दिनांक :- ____________________

१०. अधिकारी/कर्मचा-यांनी घोषित केलेला स्वग्राम तालुका व जिल्हा :- ____________________

११. शैक्षणिक अर्हता व अनुभव :-

| | |
|---|---|
| शैक्षणिक अर्हता | १.<br>२.<br>३. |
| अनुभव | १.<br>२.<br>३. |

... केलेल्या सेवेचा तपशिल :-

... असल्यास स्वतंत्र विवरणपत्र

... व त्यावर स्वतःची स्वाक्षरी करावी)

| | पद (संवर्ग अथवा प्रतिनियुक्तीवर ) | कालावधी | | वेतनश्रेणी | कामाचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |

१३. संपर्क तपशिल :-

अ) पत्ता :- ______________________

______________________

______________________

दुरध्वनी क्रमांक :- ______________________

ई-मेल ______________________

ब) कार्यालयीन पत्ता :- ______________________

______________________

______________________

दुरध्वनी क्रमांक :- ______________________

ई-मेल ______________________

मी श्री/श्रीमती ______________________ असे प्रमाणित करतो/करते की, मी प्रतिनियुक्तीने भरावयाच्या पदाच्या मागणीपत्रातील तपशिल वाचले असून पदासाठी विहित केलेल्या अर्हता मी धारण करित असल्याने सदर पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अर्ज सादर करित आहे. अर्जात नमुद केलेली माहिती खरी असून खोटी आढळून आल्यास माझा अर्ज नाकारला जावू शकतो याची मला जाणीव आहे.

सही

(नाव)

पदनाम ______________________